**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील**
**अधिका-यांच्या बदल्या / नियुक्त्या.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०११/प्र.क्र. ४८/ आस्था-३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांकः- १७ मार्च, २०११.**

**संदर्भ :** आदिवासी विकास विभाग, शासन आदेश क्र. आस्था-२०११/प्र.क्र. ५२/का.१ दि.१८.२.२०११

**आदेशः-** आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधिन आदेशान्वये **श्री.महेशकुमार मेघमाळे यांना प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट (जिल्हा नांदेड)** यांच्या सेवा ग्राम विकास विभागास प्रत्यार्पित करण्यात आल्यामुळे त्यांना नियुक्ती देणे आवश्यक आहे.

सबब, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील **श्री.महेशकुमार मेघमाळे** यांना **गट विकास अधिकारी, पंचायत समिती अंबेजोगाई, जिल्हा बीड** या रिक्त पदावर नियुक्ती देण्यात येत आहे.

२. **श्री.महेशकुमार मेघमाळे** यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, त्या शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. **श्री.महेशकुमार मेघमाळे** यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आले असून संगणक सांकेतांक २०११०३१८०४२५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

प्रधान सचिव ,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
**संबंधित अधिकारी द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, नांदेड यांचे मार्फत**
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.